सन २०२१-२२ करिता निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या राज्य योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.८४/फ-९**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- ३१ मार्च, २०२२**

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ०६ एप्रिल, २०२१
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २८.०१.२०२२
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १७ मार्च, २०२२
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांकित दिनांक ०३.०६.२०२१
७. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांकित दिनांक १३.०७.२०२१
८. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांकित दिनांक १२.११.२०२१
९. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांकित दिनांक ०६.०१.२०२२
१०. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१२३/फ-९, दिनांक १०.११.२०२१
११. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.साववि-२०२१/प्र.क्र.५४/फ-११, दिनांक १५.११.२०२१
१२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.साववि-२०२१/प्र.क्र.४८/फ-११, दिनांक २४.१२.२०२१
१३. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३७/६४६/२०२१-२२, दिनांक ०८.०३.२०२२
१४. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३७/६७७/२०२१-२२, दिनांक १६.०३.२०२२
१५. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३७/६७८/२०२१-२२, दिनांक १६.०३.२०२२

**प्रस्तावना :-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ३९२४.०० लक्ष नियतव्यय सुधारीत अंदाजानुसार मंजूर व अर्थसंकल्पित करुन दिलेला आहे. संदर्भ क्र.६ ते १२ च्या शासन निर्णयान्वये उद्दिष्टनिहाय एकूण रु.४९९.०५ लक्ष इतका निधी वितरित करण्यात आला असून रु.३३३५.५८ लक्ष इतका निधी वितरणाकरीता शिल्लक आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ चे परिपत्रकान्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या उर्वरित कालावधीसाठी ०१- वेतन व ०२-मजूरी या उद्दिष्टासाठी निधी वितरणाची मर्यादा १०० % करण्यात आली आहे. तसेच उर्वरित उद्दिष्टांमधील कार्यक्रमांतर्गत खर्चाचे निधी वितरणासाठी नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची आणि अनिवार्य खर्चाच्या निधी वितरणासाठी वित्त विभगाची मान्यता घेण्यात यावी, असे नमूद केले आहे.

सदर योजनेअंतर्गत प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.१३ ते १५ अन्वये रु.३५१५.१४७ लक्ष रकमेचे चालू बाब/नवीन बाब प्रस्ताव प्राप्त झाला असून अनुदान उपलब्ध करुन देण्यास विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यानी संदर्भ क्र.१३ ते १५ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचे संदर्भ क्र.१ ते ५ येथील परिपत्रक व शासन निर्णय विचारात घेता, प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन, निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या योजनेमधून सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात खालील तक्त्यात नमूद केलेल्या निसर्ग पर्यटन स्थळाना उपशिर्षनिहाय **रु.३०९६.९० लक्ष इतका निधी** वितरीत व खर्च करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

**(रुपये लाखात)**

| निसर्ग पर्यटन स्थळाचे क्षेत्र | ०१-वेतन | ०२-मजूरी | २१-साहित्य व पुरवठा | २७-लहान बांधकामे | ५०-इतर खर्च | वितरीत करावयाची एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|
| बोटानिकल गार्डन चंद्रपूर | -- | -- | -- | -- | ८५८.०० | ८५८.०० |
| देऊळगावं रेहेकुरी अभयारण्य | -- | ३३.४२ | ३४.५९ | १६.७९ | ८०.०० | १६४.८० |
| राधानगरी (दाजीपूर) अभयारण्य | -- | -- | -- | -- | २९.४६ | २९.४६ |
| | | १०.०० | १३.०० | | २४.०० | ४७.०० |
| | | ३०.०० | | ५४.८९ | ३६.९३ | १२१.८२ |
| मौजे कडबनवाडी, गट नं. ३६ | -- | ५०.०० | ३७.१० | ६.४१ | -- | ९३.५१ |
| मौजे कन्हेरी, गट नं.२९३ कन्हेरी वनउद्यान | -- | १२५.०० | १०३.३१ | ७५.०० | -- | ३०३.३१ |
| पेंच व्याघ्र प्रकल्प | -- | -- | १०२.०० | १२.०० | २४२.०० | ३५६.०० |
| नवेगांव-नागझिरा व्याघ्र राखीव | -- | ३०.०० | ५.०० | ५.५० | ६६.०० | १०६.५० |
| ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर | -- | १५९.०० | १२५.०० | --- | ४९८.१५ | ७८२.१५ |
| | -- | ७३.२१ | -- | १५७.४० | -- | २३०.६१ |
| चौरंगीनाथ वेतन ६ पदे | ३.७४ | -- | -- | -- | -- | ३.७४ |
| **एकूण :-** | **३.७४** | **५१०.६३** | **४२०.००** | **३२७.९९** | **१८३४.५४** | **३०९६.९०** |

**अटी व शर्ती खालीलप्रमाणे:-**

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.
२. २१- पुरवठा व सामग्री, २७-लहान बांधकामे, ५०-इतर खर्च या उद्दिटांसाठी निधी खर्च करतांना त्याबाबतचे प्रशासकीय/वित्तीय मान्यतेचे आदेश निर्गमित केले आहेत याची खात्री करण्याच्या
३. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
४. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
५. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
६. संस्थेने आर्थिक वर्ष २०२१-२२ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

७. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.

८. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

९. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

१०. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

११. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०६.०४.२०२१, २४.०६.२०२१ व १४.१०.२०२१ परिपत्रक व शासन निर्णयातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१२. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांका. एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्रमांक-सी-०७ प्रधान शिर्ष- २४०६, वनिकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) या लेखाशिर्षा अंतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१४४/१४७४, दिनांक २४.०३.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१३२/२०२२/व्यय-१०, दिनांक ३१.०३.२०२२ अन्वये वित्त विभागाचे दिनांक ०६.०४.२०२१, २४.०६.२०२१, १४.१०.२०२१, २८.०१.२०२२ व १७.०३.२०२२ परिपत्रक व शासन निर्णय तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३१२१०९३३७४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=088951d0088e627aa56c9ab088add1677b8ac27d637c5cdf80b730f756dce9e8, cn=GAJENDRA PRAKASH NARWANE
Date: 2022.03.31 21:11:41 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम मुंबई
५. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) पुणे
६. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) चंद्रपूर
७. मुख्य वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर
८. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सह्याद्री व्याघ्र राखीव कोल्हापूर
९. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर
१०. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगांव-नागझिरा व्याघ्र राखीव, गोंदिया
११. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१२. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
१३. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
१४. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)